
आर्ट ताटूम
अंध पियानो वादक



हे अमेरिकेतल्या टोलेडो शहरातलं माझं घर. इथेच माझा जन्म झाला.



हे माझे बाबा. ते कामगार आहेत.

आणि ही माझी आई.
खालच्या रस्त्याला
असलेल्या चर्चमध्ये ती
गाते. पण इथे ती गात
नाहीए. तिला
साफसफाईची खूप कामं
करायचीयत.





हा आमचा दिवाणखाना. त्या कोपऱ्यात पियानो आहे. आई कधीतरी तो वाजवते. एरव्ही तो शांतपणे कोपऱ्यात पडून असतो.



एक दिवस मी माझ्या पायाच्या अंगठ्यावर उभा राहातो. माझी बोटं किबोर्डपर्यंत पोहोचतात. मी आधी एका बोटाने, मग दोन बोटांनी, मग मुठीने आणि हातांनी पियानो वाजवू लागतो.

आई म्हणते, “तू वाजवतोयस ते ऐकायला गोड वाटतं. परत वाजव.” मी बराच वेळ वाजवतो. मग आई म्हणते, “बस झालं. आता बाहेर उजेडात जाऊन खेळ.”

पण दृष्टी खराब असल्यामुळे मला दिवस-रात्र, काळोख-उजेड यांतला फरकच कळत नाही. पियानोचे सूर, गाड्यांचे हॉर्न असे आवाज, चुलीवरच्या मक्याच्या भाकरीचा वास मात्र मला चांगले जाणवतात.



मी वयाने वाढतोय तसतशी माझी दृष्टी खराब होतेय. डोळ्यांच्या ऑपरेशनने थोडीशीच सुधारणा होतेय.

पण माझी कमकुवत दृष्टी मला पियानो वाजवण्यापासून मात्र रोखू शकत नाही. माझे हात पियानोच्या पट्ट्या ओळखू लागल्यायत. वरच्या छोट्या काळ्या पट्टया आणि खालच्या मोठ्या पांढऱ्या पट्ट्या! मी खूप वेळ पियानो वाजवतोय.

बाबा घराबाहेर पडताना मला जवळ घेऊन कुरवाळतात आणि सांगतात, “आज पियानो खराब करू नकोस.” रात्री आई जेवायला बोलवते तेव्हा मी म्हणतो, “पियानो, कुठे जाऊ नकोस. मी लगेच परततो.”



माझ्या दहाव्या वाढदिवसानंतर रेव्हरंड जॉन्सन मला चर्चमध्ये पियानो वाजवण्यास सांगतात. मला चर्च खूप आवडतं. तिथे साबण, फर्निचर पॉलिश आणि फुलांसारखा सुवास येतो. तिथे चालताना पावलांचा आवाज छानपैकी घुमतो. पण मला थोडीशी भीतीही वाटते.

पण माझी बोटं पियानोवर पडतात तेव्हा ही भीती कुठच्याकुठे पळून जाते. माझी पावलं तालावर थिरकतात. मी वाजवतो ते सूर गायकांच्या स्वरांमधल्या जागा भरून काढतात.



नंतर मार्था केमन्स मला वायएमसीएच्या वार्षिक कार्यक्रमात वाजवायला बोलावते. श्रीमती ब्रॅडफोर्ड त्यांच्या पतीच्या सत्तराव्या वाढदिवसाला वाजवायला बोलावते. माझी आई म्हणते, “तो उशीरापर्यंत बाहेर राहू शकत नाही.” पण त्याचवेळी ती माझा खांदा दाबते. लोकांच्या प्रतिसादाने तिला बरं वाटतंय, हे मला कळतं.



उन्हाळ्यात संध्याकाळी काळोख पडल्यावर आईबाबा माझ्या छोट्या भावंडांना घेऊन अंगणातल्या झोपाळ्यावर बसतात. शेजारची मुलं काचेच्या बरण्यांमध्ये काजवे पकडत इकडेतिकडे धावत असतात.

त्यांच्या बरण्या प्रकाशाने उजळून निघत असतात तेव्हा त्यांना माझे पियानोचे सूरही ऐकायला मिळतात. मी “मूनलाइट बे” आणि “शाइन ऑन, हार्वेस्ट मून” अशी सगळी चंद्र-चांदण्यांची गाणी वाजवतो. मग आई म्हणते,“किती छान वाजवतो हा!”



आमच्या शेजारी राहाणाऱ्या डेनिस आणि जनेट या जुळ्या बहिणी मला रोज शाळेत जाताना सोबत करतात. मी कुठे हरवणार नाही, गाडीखाली येणार नाही याची त्या काळजी घेतात.

वर्गात डेनिस माझ्या बाजुलाच बसते आणि मला मदत करते. वार्षिक दिनाला प्रिंसिपल हेन्रिक मला पियानो वाजवायला सांगते.



बाबा माझ्या पियानोवादनाबद्दल फारसं काही बोलत नाहीत. पण ते ऐकतात मात्र नक्की! कधकधी ते नाचतातसुद्धा! त्यांची मोठी पावलं फरशांवर थिरकतात तेव्हा जमीन हादरते. आमचे दोघांचे ताल जुळतात. असं वाटतं की माझ्यासोबत आणखी कुणी वादक वाजवतोय. तो खालचे सूर छेडतोय, त्याची पावलं तालात थिरकतायत आणि बोटं चपळाईने सुरांमधून फिरतायत. मी “मेंफीस ब्लूज” वाजवू लागलो की बाबा आईला किचनमधून बाहेर आणतात, तिचा एप्रन खुर्चीवर टाकतात आणि तिला खूप वेळ गोलगोल फिरवतात. आईला हसू आवरत नाही.





शाळा सुटल्यावर मी जवळच्या पिक-ए-रिब कॅफेत बराच वेळ घालवतो. कॅफेचे मालक श्री. बार्लेट बाबांचे मित्र आहेत. त्यांनी मला त्यांचा पियानो वाजवायची परवानगी दिलीय. या पियानोला चावी दिली की तो स्वतःहून वाजू लागतो. त्याच्या आपोआप वरखाली होणाऱ्या पट्टयांचा आवाज मी ऐकतो. मग मी वाजवतो.

कधीकधी श्री. बार्लेट किचनमधून बाहेर डोकावून म्हणतात, “आर्थर, हे तूच वाजवत होतास की पियानो स्वतःहून वाजत होता?”

कधी ते म्हणत, “मला माहितीय, तूच वाजवत होतास. माझा पियानो एवढ्या वेगाने वाजवत नाही.”

एके रात्री बाबा आणि त्यांचा मित्र एडी मला जवळच्या दारुच्या बारमध्ये घेऊन जातात. बाबा मला पियानोच्या खुर्चीवर बसवतात आणि म्हणतात, “प्ले टायगर वाजव. रेडिओवर ऐकलंयस तसंच! फक्त वेगाने.” तिथे खूप गर्दी, आवाज आणि धूर असल्यामुळे मला भीती वाटत नाही.

मी वाजवायला सुरू केल्याबरोबर शांतता पसरते. लोक दारू पिणं बंद करतात, टेबलवरचं खाणं विसरुन जातात. वेटर लोकही काम सोडून स्तब्ध उभे राहातात.

एक म्हातारा माणूस टाळ्या वाजवतो. मग जोडपी नाच सुरू करतात. ते बाबा आणि एडीसाठी दारू मागवतात आणि माझ्यासाठी आलं घातलेलं सरबत. ते माझे खिसे नाण्यांनी खचाखच भरून टाकतात.

मला माहित असलेली सगळी गाणी मी वाजवतो. दारू देणारा माणूस शिटी वाजवून एका गाण्याच्या ओळी ऐकवतो आणि विचारतो, “हे गाणं वाजवता येईल का?” मी किबोर्डवर बोटं फिरवून ते गाणं वाजवतो, “हेच गाणं ना?” मग मी आणखी काही गाणी वाजवतो.



मी “ह्युमरस्क” गाणं वाजवू लागतो तेव्हा खूप शांतता पसरते. असं वाटतं, मी तळ्यातल्या नावेत बसलोय. झाडांमधून चंद्रकिरणं डोकावतायत. पण मी उदास आहे. मला आश्चर्य वाटतं, संगीत या खोलीच्या छताला भेदून आकाशाला गवसणी घालतं? हे सूर ताऱ्यांपर्यंत पोहोचतात?

आम्ही खूप उशीरा घरी पोहोचतो पण आईला जागं करत नाही. सकाळी मी शाळेत जातो आणि बाबा कामावर. जसं काहीच घडलं नाही.

त्या दुपारी मी जमलेल्या पैशांतून आईसाठी एक सोन्याची संगीत पेटी विकत घेतो. झाकण उघडल्यावर त्यातून एक छोटीशी घंटा बाहेर येते आणि उंदरासारखा आवाज काढते. मी बाबांसाठी बेसबॉलचे हातमोजे विकत घेतो. आता बाबा कारखान्यात लंचच्या वेळेत बेसबॉल खेळू शकतात.





बाबा आणि एडी जवळजवळ रोज मला स्थानिक दारुच्या बारमध्ये घेऊन जातात. कधी आम्ही बस आणि ट्राममधून दूरवर जातो. काही वेळा बारबाहेर माझ्या नावाचा बोर्ड असतो. लोक माझा पियानो ऐकायला येतात. आता मी पियानोवर बसलो की माझी बोटं मला पाहिजे ते वाजवू लागतात. मी त्यांना शिटी वाजवायला लावतो, गायला लावतो. मी एका गाणं वाजवत असताना त्यात दुसरं गाणं गुंफू शकतो.

मी नेहमी एका गाण्यात दुसरं गाणं वाजवतो. “पुअर बटरफ्लाय” हे गाणं वाजवताना त्यातच मी “आफ्टर यू गॉन” हे गाणंसुद्धा वाजवतो. बऱ्याचदा या दोन गाण्यांमध्ये “ह्युमरस्क” हे गाणं मिसळून वाजवतो.

एक दिवस श्री. स्टोरर मला आठवड्याचे पाच दिवस त्यांच्या रेडिओ स्टेशनला गाण्याचे सुचवतात. माझ्या अपेक्षेपेक्षा खूप जास्त पैसा यात मला मिळणार आहे.

लोक मला रेडिओवर ऐकू लागलेयत. मला पियानो वाजवण्यासाठी आता देशभरातून बोलावतात. संगीत मला घरापासून दूरदूर नेतंय.





पियानो वाजवताना मी डोळे बंद करून घेतो. मी सुरांचे मेघ बरसवतो, सुरांच्या नद्या वाहावतो. माझ्या वादनातून चंडोल पक्ष्याचं गाणं आणि पानाचं सळसळणं ऐकू येतं, छतावर बरसणाऱ्या पावसाच्या थेंबांचा आवाज ऐकू येतो. माझी दृष्टी कमकुवत असल्याचं मी विसरुन जातो. मला हवं ते सगळं माझ्याकडे आहे.

बँडबाजावाले मला बोलावतात. मी इतर संगीतकारांसोबत ओहायो ते शिकागो, कॅन्सस शहर आणि न्यूयॉर्कलासुद्धा दौरे करतो. मी एडलेड हॉल, स्लॅम स्टिवर्ट आणि टायनी ग्राइम्ससोबतही पियानो वाजवतो. आता मी बराच प्रसिद्ध झालोय.

पण तरीही रात्री उशीरा लोक माझ्या अवतीभवती नाचत असतात तेव्हा मला टोलेडोचं घर आठवतं, आईबाबा, भाऊबहीण आठवतात. मला रेव्हरंड जॉन्सन, एडी आणि त्या जुळ्या बहिणीसुद्धा आठवतात. माझी खोली संगीताने भरलेली असते. त्यामुळे मी कुठे आहे, हे महत्त्वाचं नाही. मला मदत करणारे सगळे लोक मला आठवतात. या लोकांवर माझं प्रेम आहे.



## मी आणि आर्ट ताटूम

1946 साली मी न्यूयॉर्क शहरातील 52 व्या रस्त्यावर गेलो होतो. तिथे जाझ संगीतातील रथीमहारथींनी आपले संगीत कौशल्य ऐकवले होते. तिथे मी लेस्टर यंग, बेन वेब्स्टर, रॉय एल्ड्रीज, बेरील बुकर आणि आर्ट ताटूम यांना ऐकले होते. या कार्यक्रमात पियानोवर ताटूम, गिटारवर टाइनी ग्राइम्स आणि बासवर स्लॅम स्टिव्हर्ट होते. कार्यक्रमाला भरपूर गर्दी होती. ताटूमने कमालीचे वाजवले. पियानोवर काही वेगळेच चकित करणारे संगीत वाजवल्यावर तो स्मित करून लोकांकडे पाहात असे. जणू काही तो लोकांना विचारत असे, "कसं वाटलं?"

त्या रात्री ताटूमचे वय होते छत्तीस वर्षे. गेली वीस वर्षे तो व्यावसायिक पियानोवादनाचे कार्यक्रम करत होता. माझं वय होतं फक्त एकोणीस वर्षे. मी सेनादलात होतो. तेव्हापासून मी ताटूमचे संगीत ऐकण्यात व त्याच्या आयुष्याबद्दल जाणून घेण्यात बराच काळ घालवला. अनेक पुस्तकांत त्याच्या प्रौढ आयुष्याची माहिती मिळते. पण मी नेहमी त्याचे बालपण जाणून घेण्यास उत्सुक होतो. ताटूमच्या बालपणाविषयी मी जे काही वाचले त्यासोबत माझ्या कल्पनाशक्तीचा उपयोग करून मी हे पुस्तक लिहिले आहे.

## आर्ट ताटूमविषयी आणखी काही

आर्ट ताटूम तीन भावंडांमध्ये मोठा होता. तो 13 ऑक्टोबर 1910 रोजी ओहायोमधील टोलेडो शहरात जन्मला. जन्मल्यापासूनच त्याची दृष्टी कमकुवत होती. तो मोठा होत गेला तसतशी ती अधिकाधिक कमजोर झाली. त्याच्या डोळ्यांवर अनेक शस्त्रक्रिया झाल्या. पण त्याचा फारसा उपयोग झाला नाही.

ताटूम फोनोग्राफ रेकॉर्ड, प्लेयर पियानो, स्थानिक संगीतकार, रेडिओ अशा मिळेल त्या स्त्रोताकडून संगीत शिकत राहिला. त्याने काही औपचारिक शिक्षणही घेतले. त्याने भरपूर सराव केला आणि 1910 पर्यंत तो टोलेडो परिसरातील एक मान्यवर संगीतकार बनला. मोठे झाल्यावर त्याने स्पीड वेब बँडसोबत दौरे केले. लोकप्रिय गायक एडलेड हॉलसोबतही त्याने वाजवले. 1932 साली त्याने एडलेडसोबत आपले पहिले ध्वनीमुद्रण केले.

टेडी विल्सन, अर्ल हाइन्स, फॅट्स वॉलर यांसारख्या महान जाझ पियानोवादकांनी आर्टचे संगीत ऐकले. आर्टच्या संगीत प्रतिभेने आणि अविश्वसनीय तंत्राने ते सर्व दिपून गेले. शास्त्रीय संगीतातील दिग्गजही आर्टला मानू लागले.

1938 साली तातूमने लंडनच्या उत्साही लोकांना आपले संगीत ऐकवले. त्याच वर्षी पॅरिसच्या ऑर्केस्ट्रा हॉलमध्ये त्याने कार्यक्रम केला. नाइट क्लब, उपाहारगृह इथे वाजवल्या जाणाऱ्या जाझ संगीतात त्याने पाहुणा पियानोवादक म्हणून वाजवले.

तातूमने आपल्या संगीतात "कॅंपटाऊन रेसेस", "द स्टार्स अँड स्ट्रीप्स फॉरेव्हर" आणि "डॅनी बॉय" या लोकप्रिय गाण्यांतील संगीताचे तुकडे मोठ्या खुबीने वापरले. पण त्याचा आवडता तुकडा होता अँटोनिन द्वोराकच्या संगीताचा.

1930 पर्यंत तातूमचा दिनक्रम क्लबच्या तारखा, ध्वनीमुद्रण आणि भरपूर प्रवास यांमुळे खूप व्यस्त राहिला. बसमधून दीर्घकाळ प्रवास, खराब अन्न, कार्ड गेम, शुटींग पूल आणि भरपूर दारू यामुळे त्याची तब्येत ढासळली. त्याला मधुमेह झाला. तरीही तो हसतमुख राहिला. तो खूप उदार होता आणि सहजपणे मैत्री करत असे.

जाईल तिथे त्याचे स्वागत होत असे.

तो एखाद्या क्लब वा मद्यालयात जाई तेव्हा लोक आदराने म्हणत, "आता इथे संगीताचा परमेश्वर आला आहे." इतर पियानोवादक त्याच्या उपस्थितीत वाजवायला घाबरत.

1947 साली तातूमने संगीतकार नॉर्मन ग्रांजसोबत दौरे सुरू केले. त्यांच्या कार्यक्रमाचे नाव होते "जाझ अॅट फिलहार्मोनिक". यातून अनेक महान जाझ संगीतकारांनी आपले संगीत सादर केले.

1953 साली अमेरिकेतील प्रमुख शहरांमध्ये तातूमला एक विक्रम करण्यास त्याच्या मित्राने राजी केले. यातूनच त्याचे चौदा अल्बम प्रकाशित झाले. पण यानंतर तातूमची तब्येत बिघडली.

5 नोव्हेंबर 1956 रोजी वयाच्या सेहेचाळीसाव्या वर्षी आर्ट तातूमचे निधन झाले.

जाझ संगीताच्या दुनियेत अनेक दिग्गज होऊन गेले आहेत. त्यांच्या प्रतिभेइतकी उंची कुणीही गाठू शकले नाही. यांमध्ये लुइस आर्मस्ट्रॉंग, बेनी गुडमन, बडी रिच, चार्ली पार्कर, ड्यूक एलिंग्टन आणि अर्थात आर्ट तातूम यांची नावे घेता येतील.

समाप्त

